**पदविका अभ्यासक्रमाच्या प्रवेश प्रक्रियेसाठी संचालक, तंत्रशिक्षण यांना "सक्षम प्राधिकारी" म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१९/(प्र.क्र.०६/१९)/तांशि-५**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०६ फेब्रुवारी, २०१९

वाचा :-

१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीएलए-२०१५/(प्र.क्र.१६८/२०१५)/तांशि-३, दि.१ जानेवारी, २०१८.
२) शासन अधिसूचना क्र. संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२५२/तांशि-४, दि. ०५ जुलै, २०१८.
३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२५२/तांशि-४, दि. ०५ जुलै, २०१८.
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/ एडीएम/ पदविका/२०१८/१४४७, दि.१८ डिसेंबर, २०१८.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र विनाअनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम २०१५ च्या कलम २ (द) सह कलम ३(१)व (२) नुसार दिनांक १९ मे, २०१८ रोजी अधिसूचित करण्यात आलेल्या अधिसूचनेसोबतच्या अनुसूची क (Schedule A) मधील व्यावसायिक पदविका पाठ्यक्रमांपैकी अनुक्रमांक १ येथील - अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका, अनुक्रमांक २ येथील - औषधनिर्माणशास्त्र पदविका व अनुक्रमांक ३ येथील- हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका हे तीन व्यावसायिक अभ्यासक्रम संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन अधिसूचना असाधारण क्रमांक २३२ अन्वये व्यावसायिक अभ्यासक्रमांमधून वगळण्यात आलेले आहेत.

त्यानुसार, संदर्भाधिन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीता पदविका स्तरावर अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रिया प्रवेश नियामक प्राधिकरणाच्या कक्षेतून वगळून संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत पूढे चालू ठेवणेबाबत निर्देशीत करण्यात आलेले आहे.

सदर शासन निर्णयाचे अनुषंगाने पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेश प्रक्रियेशी संबंधीत बाबींची अंमलबजावणी करण्याकरीता संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "सक्षम प्राधिकारी " म्हणून घोषित करण्याची तसेच शासनमान्य प्रवेश नियमावलीच्या तरतुदींच्या अनुषंगाने विविध पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेश प्रक्रियेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयात नमुद बाबींकरीता संचालकांच्या स्वीय प्रपंजी लेख्यामधून खर्च करण्याचे सर्व अधिकार संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (सक्षम प्राधिकारी ) यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील विविध पदविका स्तरावरील अभ्यासक्रमांची प्रवेश प्रक्रिया ऑनलाईन पद्धतीने आवश्यक ती गोपनीयता राखून, उचित रितीने, विद्यार्थी व पालक यांचे हित विचारात घेता प्रचार, प्रसार व जागरूकता निर्माण करुन प्रक्रिया राबविण्याच्या संबंधात सर्व निर्णय घेण्याचे अधिकार संचालक, तंत्रशिक्षण यांना असणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका, औषधनिर्माणशास्त्र पदविका व हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका या पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेश प्रक्रियेकरिता संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना **"सक्षम प्राधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. तसेच, शासनमान्य प्रवेश नियमावलीच्या तरतुदींच्या अनुषंगाने विविध पदविका अभ्यासक्रमांच्या प्रवेश प्रक्रियेकरीता प्रभावी अंमलबजावणीसाठी आवश्यक ती ऑनलाईन संगणकीय प्रणाली विकसीत करणे आणि ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेची संवेदनशीलता व गोपनीयता अबाधित ठेवण्याच्या उद्देशाने आवश्यक ते सॉफ्टवेअर विकसित करण्याच्या कामगिरीसाठी शासनाच्या प्रचलित कार्यपद्धतीनुसार आवश्यक त्या सेवापुरवठादारांची नियुक्ती करण्याचे व पदविका प्रवेश प्रक्रियेसंबंधी आवश्यक त्या सर्व बाबींवर, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीएलए-२०१५/(प्र.क्र.१६८/२०१५)/तांशि-३, दि.१ जानेवारी, २०१८ मधील तरतुदींनुसार संचालकांच्या स्वीय प्रपंजी लेख्यामधून खर्च करण्याबाबची कार्यवाही करण्याचे अधिकार संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (सक्षम प्राधिकारी) यांना प्रदान करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०६१६५८४९२२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce, serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b6511197206b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2019.02.06 17:00:27 +05'30'

**(अनिल काटकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२.संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई,
३.सर्व, सह-संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय (संचालक, तंत्रशिक्षण यांच्या मार्फत),
४.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य मुंबई,
५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई /नागपूर,
६.अधिदान व लेखाधिकारी, बृन्हमुंबई,
७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालक, तंत्रशिक्षण यांच्या मार्फत),
८. अवर सचिव (तांशि-३) /कक्ष अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. वित्त विभाग व्यय-५/कोषा (प्रशा), मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती.